मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सतराव्या तिमाही (Quarter-१७) हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-३११६/प्र. क्र. ७७/भाग-५/पोल-३**
गृह विभाग, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ३१.०३.२०२२

वाचा -

१) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आयएसएस १००९/प्र.क्र.३१३/विशा-४, दि.२७.०७.२०११.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.आयएसएस-१००९/प्र.क्र.३१३ (भाग-२)/विशा-४, दि.६.०१.२०१२.
३) महाराष्ट्र शासन आणि मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी यांचे दरम्यान दि.७.२.२०१५ रोजी झालेला करार.
४) शासनाचे क्र.सीसीटी ३११५/प्र.क्र.२१/पोल-३,दि.७.२.२०१५ चे कार्यादेश.
५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.४.२०१७
७) गृह विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र. क्र. ६४/विशा -३(अ), दि.०४.०८.२०१७.
८) गृह विभाग, शासन पत्र क्र.३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दिनांक ०८.११.२०१७.
९) गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी-३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दि.०५.११.२०१८.
१०) गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी-३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दि.२६/२/२०१९
११) प्रकल्प संचालक, मे.लार्सन अँड टुब्रो कंपनीचे दिनांक १७/३/२०२२ रोजीचे पत्र व त्यासोबत सादर केलेली सतराव्या तिमाहीची देयके.
१२) प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी कंपनीने दिनांक २६/३/२०२२ रोजीच्या ई मेल संदेशाद्वारे सादर केलेला अहवाल.
१३) पोलीस उपायुक्त (अभियान) मुंबई शहर यांचे दिनांक २९/३/२०२२ रोजीचे पत्र.

प्रस्तावना-

मुंबई शहरात सुरक्षेच्या दृष्टीने सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी मे. लार्सन ॲन्ड टुब्रो कंपनी लि. या कंपनीसोबत दि.०७.०२.२०१५ रोजी शासनाने करार केला आहे. सदर करारानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाची एकूण किंमत रु.९४९ कोटी एवढी ठरविण्यात आली आहे. सदर प्रकल्पासाठी गृह विभाग, शासन निर्णय दि.०६.०१.२०१४ अन्वये एकूण रु.६०० कोटी एवढया रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तद्नंतर गृह विभाग शासन निर्णय दि.०२.३.२०१६ अन्वये रु. ३४९ कोटी एवढया रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तद्नंतर गृह विभाग शासन निर्णय दि. ०५.११.२०१८ अन्वये रु.९८०,३३,८०,०२४/-(अक्षरी रुपये नऊशे ऐंशी कोटी तेहतीस लाख ऐंशी हजार चोवीस) एवढया रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तदनंतर गृह विभाग शासन निर्णय दि. २६.०२.२०१९ अन्वये रु.१३०३.५६ कोटी(अक्षरी रुपये एक हजार तीनशे तीन कोटी छप्पन लाख ) एवढ्या रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाचे काम शहराच्या क्षेत्रानुसार तीन टप्प्यात करण्यात येणार होते. परंतु काही तांत्रिक व प्रशासकीय अडचणीमुळे दि.१०.०५.२०१६ रोजीच्या उच्चस्तरीय शक्तीप्रदान समितीच्या बैठकीमध्ये शहरात बसविण्यात आलेल्या कॅमेऱ्यांच्या संख्येनुसार कामाचे टप्पे निश्चित करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार पहिल्या टप्प्यामध्ये (phase-I) मध्ये ९३७ कॅमेरे कार्यान्वित (Go-Live) करणे, दुस-या टप्प्यामध्ये १८८० कॅमेरे कार्यान्वित करणे व तिस-या टप्प्यामध्ये १८८० कॅमेरे कार्यान्वित

करणे आवश्यक आहे. त्यानुसार शासनाने मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाचा पहिला टप्पा दि. ४.६.२०१६ पासून कार्यान्वित (Go-Live) झाला असे दिनांक २०.६.२०१६ च्या पत्रान्वये घोषित केले आहे. त्यानंतर मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाचा दुसरा टप्पा दि.१९.९.२०१६ पासून कार्यान्वित (Go-Live) झाला असे दिनांक १९.९.२०१६ च्या पत्रान्वये घोषित करण्यात आले आहे. उच्चस्तरीय शक्तीप्रदान समितीच्या बैठकीमधील निर्णयाच्या अनुषंगाने मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या तिसऱ्या टप्प्यासह प्रकल्प दि.०५.०९.२०१७ पासून कार्यान्वित (Go-Live) झाला असे दिनांक ०८.११.२०१७ च्या पत्रान्वये घोषित करण्यात आले आहे.

मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी लि. व शासन यांच्यामध्ये दि.०७.०२.२०१५ रोजी मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासंदर्भात झालेल्या करारानुसार सदर प्रकल्प कार्यान्वित झाल्यावर भांडवली खर्चाची उर्वरित २०% रक्कम व कार्यान्वयन खर्च (OPEX) हा २० समान तिमाही हप्त्यामध्ये प्रकल्प संचालक कंपनीस अदा करणे आवश्यक आहे. त्यानुसार मे. लार्सन ॲन्ड टुब्रो कंपनीने संदर्भाधीन क्र.११ येथील दि.१७/३/२०२२ रोजीच्या पत्रान्वये मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या सतराव्या तिमाहीची (Seventeen Quarter ) देयके सादर केली असून ती अदा करण्याची विंनती केली आहे. त्यानुषंगाने प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी कंपनीने उपरोक्त संदर्भाधीन क्र.१२ येथील दि.२६/३/२०२२ रोजी सादर केलेल्या अहवालानुसार सदर प्रकल्पाच्या सतराव्या तिमाहीसाठी (Seventeen Quarter ) रु.३१,७१,६७,८६०/- (अक्षरी रुपये एकतीस कोटी एकाहत्तर लाख सदुसष्ट हजार आठशे साठ फक्त) एवढी रक्कम देय होत आहे. संदर्भाधीन क्र.१३ येथील पोलीस उपायुक्त (अभियान), मुंबई शहर यांनी दि.२९/३/२०२२ रोजीच्या पत्रान्वये सतराव्या तिमाहीसाठीचे User Certificate सादर केले आहे. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी लि. व शासन यांच्यामध्ये दि.०७.०२.२०१५ रोजी मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासंदर्भात करार झालेला आहे. सदर करारानुसार सदर प्रकल्प कार्यान्वित झाल्यावर भांडवली खर्चाची उर्वरित २०% रक्कम व कार्यान्वयन खर्च (OPEX) हा २० समान तिमाही हप्त्यामध्ये प्रकल्प संचालक कंपनीस अदा करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या सतराव्या तिमाहीची (Seventeen Quarter) करिता प्रकल्प संचालक, मे.लार्सन अँड टुब्रो कंपनीस देय रु.३१,७१,६७,८६०/- (अक्षरी रुपये एकतीस कोटी एकाहत्तर लाख सदुसष्ट हजार आठशे साठ फक्त) एवढी रक्कम वितरित करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कमेची देयके कंपनीला अदा करतांना आयकर व इतर प्रचलित कर वजाती करुन अदा करण्यात यावी.सदर रकमेत जीएसटी कराचा समावेश आहे.

३. प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त प्रमाणे होणारा खर्च हा “मागणी क्र.बी-१०, ४०५५ - पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या अंतर्गत ५२- यंत्रसामग्री साधनसामग्री” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा

४. सदरहु रक्कम आहरीत करण्यासाठी पोलीस आयुक्त, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिका-याला आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषीत करण्यात येत आहे. त्यांनी उपरोक्त निधी प्रकल्प संचालक Larsen & Toubro Ltd.-SW&C BU या कंपनीच्या १६३, अन्नासलाई, चेन्नई-६०० ००२ येथील सीटी बँकेच्या शाखेचे खाते क्र.०५२१४६६३०८ (IFSC Code - CITI००००००३) (MICR CODE OF THE BANK-६०००३७००२) या खात्यावर जमा करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१३२/२०२२/व्यय-७, दि.२४/३/२०२२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११६५२२९५४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RUPALI SANJOG KABARE

Digitally signed by RUPALI SANJOG KABARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5CB43A03D973FF96AABBF02A74864A4681399FE663D8FBDE0441A596BEB3ACDD, cn=RUPALI SANJOG KABARE
Date: 2022.03.31 16:56:37 +05'30'

**( रुपाली कबरे )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
६. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. पोलीस आयुक्त, मुंबई.
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. मे. लार्सन अँड टुब्रो कं. लि, एल अँड टी हाऊस, एन. एम. मार्ग, बलार्ड इस्टेट, मुंबई-१.
१३. मे.प्राईसवॉटर हाऊस कुपर्स लि., २५२, वीर सावरकर मार्ग, दादर (प), मुंबई-४०० ०२८.
१४. वित्त विभाग, व्यय-७/वित्तीय सुधारणा.
१५. अर्थसं-१/गृह विभाग, मुंबई.
१६. रोख शाखा/ गृह विभाग, मुंबई.
१७. निवडनस्ती, पोल-३.